**सन २०१८-१९ करिता जागतिक कृषि गणना या योजनेसाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- कृगयो-२०१८/प्र.क्र.७६/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १३ जुलै, २०१८

वाचा :-
१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य -२०१७/प्र.क्र.२५/११-अे, दि.१२.०३.२०१८
२) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३,दि.०२.०४.२०१८
३) भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग यांचे पत्र क्र. एफ ११०१४-२/२०१८-अेसीयू, दि.२६.०६.२०१८
४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/कृ.ग./अनुदान/बीडीएस/प्र.क्र.२/२०१८-१९/२०८/२०१८, दि.२७.०६.२०१८

**प्रस्तावना :-**

जागतिक कृषि गणना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेसाठी (२४०१ ०९९६) सन २०१८-१९ या वर्षाकरीता केंद्र शासनाकडून पहिल्या हप्त्याची रु.९९.०० लाख इतकी रक्कम प्राप्त झालेली आहे. सदरची रु. ९९.०० लाख इतकी रक्कम मासिक निधी वित्तीय प्रणालीवर वितरीत करण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने केली आहे. त्यानुसार वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेस पहिल्या हप्त्यासाठी केंद्र शासनाव्दारे प्राप्त रु.९९.०० लाख निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा आहे किंवा कसे याबाबत अभिप्राय देण्याची विनंती करण्यात आली असता अर्थोपाय शाखेने सदरची रक्कम राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा झाले असल्याचे कळविले आहे. त्या अनुषंगाने सदर रु.९९.०० लाख इतकी रक्कम मासिक निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जागतिक कृषि गणना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेसाठी (२४०१ ०९९६) सन २०१८-१९ या वर्षाकरीता केंद्र शासनाकडून पहिल्या हप्त्याची रु.९९.०० लाख इतकी रक्कम प्राप्त झालेली आहे. सदरची रु. ९९.०० लाख इतकी रक्कम मासिक निधी वित्तीय प्रणालीवर वितरीत करण्याबाबत कृषि आयुक्तालयाने केलेल्या विनंतीनुसार तसेच वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने सदरची रक्कम रु.९९.०० लाख राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा झाले असल्याबाबत प्रमाणित केल्यानुसार रु.९९.०० लाख इतकी रक्कम खालीलप्रमाणे उपलेखाशिर्षनिहाय मासिक निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाख)

| अ.क्र. | उपलेखाशिर्ष | रक्कम रुपये (लाखात) |
|---|---|---|
| १ | वेतन -०१ | ५०.०० |
| २ | प्रवास भत्ता -११ | १.०० |
| ३ | कार्यालयीन खर्च -१३ | १०.०० |
| ४ | इतर खर्च -५० (मानधन व टॅब्यूलेशन) | ३७.५० |
| ५ | प्रकाशने-१६ | ०.५० |
| | **एकूण रुपये** | **९९.००** |

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा:-

"मागणी क्रमांक डी-३,
२४०१,पीक संवर्धन
१११ कृषि अर्थशास्त्र व सांख्यिकी
केंद्र पुरस्कृत योजना
(००) (१०) जागतिक कृषि गणना- (१०० टक्के केंद्र पुरस्कृत) (२४०१ ०९९६)"

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा - १), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये वितरीत करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०७१३१६४२५९९००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2018.07.13 16:44:58 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

१) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-०३२
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)

३) उप-आयुक्त (कृषिगणना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
४) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
५) सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
६) महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखावअनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७) संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) वित्तविभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१०) नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११) ११ सहसचिव (११-अे / २-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-०३२
१२) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३) निवडनस्ती, का - ११-अे.